पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ पुणे या महामंडळाच्या संचालक मंडळाची पुनर्रचना करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक : पविआ-२०२१/प्र.क्र.३१९/पदुम-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक : १२ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना :-**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ पुणे या महामंडळाचे Memorandum Of Association And Articles Of Association हे सन १९७८ मध्ये तयार करण्यात आले असून त्यामधील कलम ७१, ७२ व ७३ मधील तरतुदीनुसार एकूण ११ संचालक व १ अध्यक्ष अशी महामंडळच्या संचालक मंडळाची संरचना केली आहे. सदर संचालक मंडळामध्ये १ अशासकीय व्यक्ती अध्यक्ष, ८ अशासकीय संचालक आणि ३ शासकीय पदसिध्द संचालक अशा एकूण १२ व्यक्तींचा समावेश आहे. सदर महामंडळाच्या Memorandum Of Association And Articles Of Association मध्ये सुमारे ४४ वर्षा पासून कोणताही मोठया प्रमाणात बदल अथवा सुधारणा करण्यात आलेली नाही. महामंडळाचे कामकाज गतिमान होण्यासाठी महामंडळाच्या संचालक मंडळाची पुनर्रचना करणे आवश्यक आहे. त्यामुळे उपासनी समितीचा अहवाल विचारात घेऊन महामंडळाच्या संचालक मंडळाची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

२. वर नमूद केलेली वस्तुस्थिती व उपासनी समितीचा अहवाल विचारात घेता, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे या महामंडळाच्या Memorandum Of Association And Articles Of Association मधील कलम ७१ व ७३ मधील तरतुदीनुसार या पूर्वी करण्यात आलेली संचालक मंडळाची संरचना रद्द करुन खालीलप्रमाणे संचालक मंडळाची पुनर्रचना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | विवरण | पदनाम |
|---|---|---|
| १ | मा. राज्यपाल यांनी नियुक्ती केलेले अध्यक्ष | अध्यक्ष |
| २ | सचिव/प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | संचालक |
| ३ | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | संचालक |
| ४ | उप सचिव/ सह सचिव (पशुसंवर्धन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | संचालक |
| ५ | अवर सचिव (पदुम-३), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | संचालक |
| ६ | व्यवस्थापकिय संचालक ,पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे | संचालक तथा सदस्य सचिव |
| ७ | मा. राज्यपाल यांनी नियुक्ती केलेले अशासकीय संचालक (एक) | संचालक |

३. तसेच सदर महामंडळाच्या अध्यक्षपदी मा. राज्यपाल यांच्याकडून जो पर्यंत नियमीत स्वरुपात नियुक्ती करण्यात येत नाही, तो पर्यंत सचिव/ प्रधान सचिव (पदुम) हे महामंडळाचे पदसिध्द अध्यक्ष म्हणून काम पाहतील.

४. सदर संचालक मंडळाच्या बैठकीचे/सभांचे कामकाज पाहण्यासाठी व्यवस्थापकिय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे हे सदस्य सचिव म्हणून काम पाहतील.

५. या संदर्भात पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे महामंडळाच्या Memorandum Of Association And Articles Of Association मध्ये वरील प्रमाणे सुधारणा करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०११२१६३२१८८८०१ आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, pseudonym=DC507174367F67372038B4A3876B5734B8B7FD46, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2022.01.12 16:33:32 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे- ६७

४. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, लि. गोखलेनगर, पुणे

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर

६. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

७. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

९. निवड नस्ती (पदुम-३)